# इग्लुकची सील



बर्नार्ड वाईसमॅन

मराठी: वंदना पलसाने

# इग्लुकची सील



बर्नार्ड वाईसमॅन

मराठी: वंदना पलसाने



इग्लुक झोपला होता.

त्याच्या बाबांनी त्याला हलवून उठवले.

“उठ, बाळा,” ते म्हणाले.

“आज तू माझ्याबरोबर शिकारीला जाणार आहेस.”

इग्लुकची आई म्हणाली,
“तो फक्त सहा वर्षांचा आहे.”



त्याचे वडील हसले.

“माझ्या पहिल्या शिकारीच्या वेळी
मी त्याच्याही पेक्षा लहान होतो.”

इग्लुकच्या आईने देवमाशाच्या
चरबीचा छोटा तुकडा कापला.

ती म्हणाली, “हे घे तुझे जेवण.”



ते सर्व लोक देवमाशाचे मांस खात.

मग शिकारीसाठी निघायची वेळ झाली.

इग्लुक आणि त्याच्या बाबांनी सीलच्या कातड्याचे बूट, फरचा कोट आणि फरचेच हातमोजे घातले.



इग्लुकचे बाबा इग्लुकला हसून म्हणाले,
“बघ, मी तुझ्यासाठी गंमत बनवली आहे.”
मग त्यांनी इग्लुकला एक छोटा भाला दिला.



“आता आपल्याला निघायला हवे”, त्याचे बाबा म्हणाले.

आणि मग ते सरपटत आपल्या इग्लू मधून म्हणजेच बर्फाच्या घरामधून बाहेर आले.



त्यांनी कुत्र्यांना स्लेजला बांधले.

इग्लुकचे बाबा ओरडले. “मुश!”

आणि कुत्र्यांनी स्लेज वेगाने ओढली.

पाहता पाहता स्लेज घसरू लागली

आणि ते बर्फाजवळ आले.





त्यानंतर त्यांनी स्लेज सोडून दिली.

इग्लुकचे बाबा म्हणाले, “आता आपण चालायला नको.

आपण बर्फावरून सरपटत जाऊया.

त्यामुळे सील आपल्याला पण सील समजतील.

मग त्या आपल्याला घाबरणार नाहीत.”

ते दोघे बर्फावर सरपटू लागले.

इग्लुकच्या बाबांनी खुणावले.

“ते बघ तिकडे, मला वाटतं एक सील दिसते आहे मला,”

त्यांनी हलकेच इग्लुकच्या कानात सांगितले.





सील नीट दिसावी म्हणून इग्लुक उभा राहिला.

सील ने इग्लुकला पाहिले.

सीलला कळले की इग्लुक सील नाही.

ती बर्फाच्या एका छिद्रात उडी मारून गायब झाली.



“अरेरे, मला माफ करा,” इग्लुक म्हणाला.

त्याचे वडील म्हणाले, “हरकत नाही.

आपल्याला अजुन बऱ्याच सील मिळतील.”

त्यानंतर त्यांना एक नाही तर दोन-दोन सील दिसल्या
– एक मोठी आणि दुसरी छोटी.

इग्लुकचे वडील हळूच इग्लुकच्या कानात म्हणाले,
“तू आपला भाला इथून नाही फेकू शकणार.
आपण सीलपाशी सरपटत जाऊया.”



ते सरपटत जिथे सील होत्या तिथे त्यांच्या खूप जवळ गेले.

मोठ्या सीलने ओळखले की हे लोक सील नाहीत.

ती छोट्या सील वर भुंकली.

मग दोन्ही सील बर्फाच्या एका छिद्रात जाण्यासाठी उड्या मारू लागल्या.

“पटकन!” इग्लुकचे बाबा ओरडले.

“आपला भाला फेक! मोठ्या सील वर!”

इग्लुकने उडी मारून आपला भाला फेकला.

पण मोठ्या सीलने त्या आधीच छिद्रात उडी मारली.

भाला बर्फावर जाऊन आपटला.



छोटी सील अजूनही छिद्रापाशी जाण्यासाठी उड्या मारत होती.

इग्लुकचे वडील वेगाने धावत आले आणि आधी तिथे पोचले.



“आपला भाला उचल, आणि व्यवस्थित नेम धर.

ही सील दूर नाही जाऊ शकणार.”

ते इग्लुकला म्हणाले.

इग्लुक ने आपला भाला उचलला.

पण त्याने तो फेकला नाही.



"का, काय झालं?" बाबा ओरडले.

"तू कशाची वाट बघतो आहेस?"

इग्लुक म्हणाला, "ही सील तर खूपच छोटी आहे.

ती अगदी लहान बाळ आहे."

"हो, आपण तिला नक्कीच खाऊया," त्याचे वडील म्हणाले

आणि त्यांनी पुन्हा आपला भाला उचलला.



तेव्हा इग्लुक उडी मारून आपल्या बाबांच्या

आणि छोट्या सीलच्या मध्ये जाऊन उभा राहिला.

"नाही, बाबा नाही," तो ओरडला.

"आपण फक्त मोठ्या सीलना खाणार."

“माझं ऐक,” इग्लुकचे बाबा म्हणाले.

“बघ, आई सील निघून गेली आहे.

हे बेबी सील आता आपल्या आईचे दूध नाही पिऊ शकणार.

आणि मासे खायला तर ते अजून खूपच लहान आहे.

ते उपाशी मरून जाईल.

किंवा कुठले तरी ध्रुवावरचे अस्वल येऊन तिला खाऊन टाकेल.”



“असं नाही होणार!” इग्लुक ओरडला.

आणि त्याने त्या बेबी सीलला उचलून घेतले

आणि तिला स्लेज जवळ घेऊन आला.



इग्लुक बेबी सीलला घरी घेऊन आला.

त्याची आई म्हणाली, “अरे व्वा, तू काहीतरी

आणलेलं दिसतंय!

मला वाटतं, तू छान शिकार केली आहेस.”

इग्लुकने बेबी सीलला बर्फाच्या फरशीवर ठेवलं.

त्याची आई ओरडली, “पण हे अजुन हलतंय!”

त्याचे वडील म्हणाले, “सील हलते आहे यात कसले आश्चर्य!

आपल्या मुलाने तिला आपल्या भाल्याने मारलेच नाही.”





इग्लुकची आई हसली.

“पहा तर ती कशी वास घेते आहे

आणि कशी पाहते आहे!

ती एखाद्या छोट्या कुत्र्यासारखी दिसते आहे.”

“ती छोटा कुत्रा नाही, ती एक बेबी सील आहे.”

इग्लुकचे बाबा म्हणाले.

“मासे खाण्यासाठी ती अजून खूपच लहान आहे.

आपल्या घरी तिला द्यायला दूध नाही.

मला वाटतं ती उपाशी मरून जाईल.”

इग्लुकने विचारले,

“पण ती एखाद्या आई कुत्रीचे दूध नाही का पिऊ शकणार?”

“कुत्रा बेबी सीलला खाऊन टाकेल,” त्याचे बाबा म्हणाले.

इग्लुकच्या आईने एका भांड्यात मासा आणि बर्फ टाकला.

आणि तिने माश्याचे सूप बनवले.

बेबी सीलने सूपाचा वास घेतला.

आणि मग सगळे सूप पिऊन भांडे साफ करून टाकले.



"ठीक आहे," इग्लुकचे बाबा म्हणाले,

"बेबी सील उपाशी मरणार नाही, हे नक्की.

पण बाळा, तुला तिच्यासाठी अन्न मात्र मिळवावे लागेल.

आपले पोट भरण्यासाठी मला शिकार करायला हवीच."



इग्लुकने सीलचे डोके थोपटले.

"ती जे काही खाईल ते पकडण्याचा मी प्रयत्न करेन.

पण आता माझ्या बेबी सीलला नाव दिले पाहिजे.

मी तिला सुलक म्हणेन.



दुसऱ्या दिवशी इग्लुक पुन्हा आपल्या बाबांसोबत गेला.

त्याचे बाबा म्हणाले, “मी शिकार करायला जातोय.

तू बर्फात कुठे छिद्र आहे का ते शोध.

तू हा मासे पकडण्याचा हुक आणि गळ वापर.

तुझ्या सील साठी तू मासे पकड.”

इग्लुकने गळाच्या काट्यावर एक चरबीचा तुकडा लावला.

आणि त्याने त्या काट्याला बर्फाच्या एका छिद्रात टाकले.



त्याला काहीतरी खेचल्यासारखे जाणवले,

आणि त्याने गळ वर ओढला.

पण गळाला मासा लागलाच नव्हता.

इग्लुकने आपला गळ पुन्हा छिद्रात टाकला.

या वेळी मात्र त्याने जोरदार तणाव येण्याची वाट पाहिली.



त्याने गळ वर खेचला.

आणि पाहतो तर काय,

या वेळी गळाला एक मोठा मासा लागला होता.

इग्लुक ने आपल्या बेबी सील साठी अन्न मिळवले होते



त्या रात्री सुलकने एक वाटी माश्याचे सूप पिऊन टाकले.

इग्लुक म्हणाला, “पाहताय ना, बाबा?

बेबी सीलला जे लागेल ते मी पकडून आणू शकेन.”

इग्लुकचे बाबा हसले.

“तिला लवकरच भरपूर अन्न लागणार आहे.”

आणि खरंच, लवकरच सुलक भरपूर अन्न खाऊ लागला.

रोज रात्री तो आधीच्या रात्रीपेक्षा बरंच जास्त सूप पीत असे.

आता सुलकने मासा सुद्धा खायला सुरुवात केली होती.

आणि रोज रात्री, तो आधीच्या रात्रीच्या तुलनेत जास्त मासा खात असे.



आता इग्लुकला भरपूर मासे पकडावे लागत.

तो दिवसभर फक्त मासेच पकडत असे.

लोक इग्लुकला हसत.

एक आजोबा त्याला म्हणाले,

“तू एक व्हेल पकड. मग तुझी सील उपाशी नाही राहणार.”



इतर मुले इग्लुकला चिडवीत.

एक मुलगा म्हणाला,

“इग्लुक दिवसच्या दिवस मासे पकडतो.

लवकरच त्याला रात्रभर मासे पकडावे लागतील.”

इग्लुकची आई म्हणाली,

“बघ ना बाळा, लोक तुला हसतात.

मुले तुला चिडवतात.

आणि मासे पकडण्याच्या नादात

तुझ्याजवळ खेळायला वेळच उरत नाही.”

इग्लुक चे बाबा म्हणाले,

“तुझ्या जवळ शिकार शिकण्यासाठी सुद्धा वेळ नाही उरत.

दिवसभर तू मासेच पकडतो,

आपल्या बेबी सील साठी.”



एक दिवस जेव्हा इग्लुक मासे पकडत होता तेव्हा त्याची आई म्हणाली,

“माझ्या मुलाला खेळण्यासाठी वेळ मिळाला पाहिजे.

त्याला शिकार शिकण्यासाठी सुद्धा वेळ मिळाला पाहिजे.

मी आता या सीलला घालवून देणार आहे.”



आणि मग आईने सुलकला बर्फाच्या घराबाहेर हाकलले.

तेवढ्यात तिने भुंकण्याचा आणि गुरगुरण्याचा आवाज ऐकला.

“अरे नाही, नाही!” ती ओरडली.

“कुत्री सुलकला खाण्याचा प्रयत्न करत आहेत की काय! असं नकोय व्हायला.”

ती पळत बाहेर गेली आणि तिने कुत्र्यांना हाकलले.



जेव्हा इग्लुक घरी पोचला तेव्हा त्याला दिसले की सुलक कुणाशी तरी भांडून आला आहे.

“काय झालं?” इग्लुकने विचारलं.

आईने त्याला सगळा किस्सा सांगितला.

इग्लुक म्हणाला, “आता मी मासे पकडायला जाताना सुलकला सुद्धा आपल्या सोबत घेऊन जाईन.”

“तू असे नाही करू शकत,” त्याचे बाबा म्हणाले.

“सुलक आता खूप मोठा झाला आहे. सुलक मुळे सगळी स्लेज भरून जाईल.

मग मी जे काही पकडेन ते ठेवायला जागाच उरणार नाही.”

इग्लुक म्हणाला, “बाबा, कृपया माझ्यासाठी पण एक स्लेज बनवून द्या.”

त्याच्या बाबांनी लाकडाचे तुकडे गोळा केले.

लाकडी तुकडे आणि कातड्याचे पट्टे घेऊन त्यांनी एक स्लेज बनवली.

स्लेजला ओढण्यासाठी त्यांनी इग्लुकला चार कुत्री सुद्धा दिली.

दुसऱ्या दिवशी सकाळी इग्लुक सुलकला बर्फावर घेऊन गेला.

इग्लुक म्हणाला, “तू पळून जावे असे मला वाटत नाही.”

म्हणून मग त्याने सुलकच्या गळ्यात एक दोरी बांधली.





इग्लुकने एक मासा पकडला.

सुलक भुंकू लागला आणि दोरी ओढू लागला.

त्याला बर्फाच्या त्या छिद्रात उडी मारायची होती.

इग्लुक म्हणाला, “तुला तिथे जायचे आहे का?

तुला इतर सील सोबत राहायचे आहे ना!

तू आनंदी असावे असं मला पण वाटतं.

मी तुला सोडून दिले पाहिजे.”



इग्लुकने सुलकच्या गळ्याला बांधलेला दोर सोडून दिला.

त्यानंतर सुलकने बर्फाच्या त्या छिद्रात बुडी मारली.

इग्लुक स्लेजच्या दिशेने चालू लागला.

तोच त्याला सीलच्या भुंकण्याचा आवाज ऐकू आला.



इग्लुकने वळून पाहिले. त्याला सुलक दिसला.

इग्लुकने पाहिले की एक मोठा मासा बर्फावर फडफडत होता.

इग्लुक पळत सुलक जवळ गेला

आणि त्याने त्याला मिठी मारली.



"अरे व्वा!" इग्लुक ओरडला.

"अच्छा, तर तुला मला सोडून जायचं नव्हतं.

तुला तर मासे पकडायचे होते.

तू एक सील आहेस.

आणि सीलला मासे पकडायला खूप आवडतं!"

सुलक ओरडला आणि त्याने पुन्हा छिद्रात सूर मारला.

आणि तो एकामागून एक मासे पकडत गेला.

सुलकने भरपूर मासे खाल्ले, पण सगळे नाही.

त्याला स्वत: खाण्यासाठी लागतील

त्याही पेक्षा जास्त मासे त्याने पकडले.

जेव्हा निघण्याची वेळ झाली

तेव्हा बर्फावर माश्यांचा एक मोठा ढीग होता.

इग्लुकने त्या सर्व माशांना स्लेज मध्ये भरले.

आता सुलक साठी स्लेज मध्ये बसायला जागाच उरली नव्हती.

त्यामुळे मग सुलकला माशांच्या ढिगावर बसावे लागले.



लोकांनी जेव्हा एवढे सारे मासे पाहिले तेव्हा ते चकितच झाले.

“इग्लुक,” एक आजोबा म्हणाले, “तू एक महान मच्छीमार आहेस!”

इग्लुक म्हणाला, “हे मासे मी नाही पकडले.”

“सुलक, माझी सील, तिने ते पकडले आहेत.”

त्यानंतर इग्लुकने सर्व लोकांना मासे वाटले.





दुसऱ्या दिवशी पण सकाळी सर्वांजवळ खाण्यासाठी मासे उरले होते.

इग्लुकच्या बाबांना शिकार करायला जाण्याची गरज नव्हती.

आणि इग्लुकला पण मासे पकडायला जायची गरज नव्हती.

इग्लुक बाहेर खेळायला पळाला.

पण बाहेर खेळायला कुणी मुलेच नव्हती.

बाहेर कुणीच नव्हते.

"बाबा," इग्लुक ओरडला,
"सगळे लोक कुठे गेले?"





इग्लुकचे बाबा हसून म्हणाले,

“ते सगळे बर्फावर गेले आहेत,

सीलच्या पिल्लांना शोधायला!

त्या सर्वांना आता तुझ्यासारखी सील हवी आहे!”

